पोलीस निरीक्षक व सहाय्यक पोलीस निरीक्षक यांच्या पदाचा दर्जा वाढ करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक-पीएमएन-०२९७/सीआर-४७४/पोल-५(ब)
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक- २६ फेब्रुवारी, २००४.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्रातील पोलीस बल हे देशातील अग्रेसर पोलीस दल म्हणून ओळखले जाते. राज्यातील पोलीसांना कर्तव्यावर अहोरात्र अतिशय जोखमीचे व जिवावर बेतणारे काम करावे लागते. घनदाट जंगलातील सशस्त्र नक्षलवादी, सुसज्ज गुंड टोळया, संघटीत गुन्हेगारी, दरोडेखोर यांचेबरोबर सामना करावा लागतो. महाराष्ट्रातील वाढती गुन्हेगारी, अर्थविषयक नव्याने निर्माण होणारे प्रश्न, महिलांवर होणारे अत्याचार, सामाजिक स्वरुपाचे गुन्हे अशा समस्यांचा बिमोड करण्यासाठी व पोलीस दल सक्षम होण्यासाठी खास ठोस पावले उचलणे आवश्यक आहे. त्याचाच एक भाग म्हणून पोलीसांमध्ये चैतन्य, गतीमानता व आधुनिकता आणण्यासाठी पोलीस दलातील पोलीस निरीक्षक व सहाय्यक पोलीस निरीक्षक या पदांचा दर्जा वाढविण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती. त्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र पोलीस दलातील सध्या राजपत्रित "ब" वर्ग असलेल्या पोलीस निरीक्षक या पदाचा दर्जा वाढवून ते पद आता राजपत्रित "अ" वर्ग आणि सध्या "क" वर्ग असलेल्या सहाय्यक पोलीस निरीक्षक या पदाचा दर्जा वाढवून आता ते राजपत्रित "ब" वर्ग करण्यात येत आहे.

२. दर्जा वाढीमुळे पोलीस निरीक्षक या पदाची वेतनश्रेणी रु.७४५०-२२५-११५०० अशी राहील. मात्र सध्या सहाय्यक पोलीस निरीक्षक या पदाची वेतनश्रेणी रु.६५००-२००-१०५०० अशी आहे, या वेतनश्रेणीमध्ये कोणताही बदल होणार नाही.

३. यासाठी होणारा खर्च "२०५५-पोलीस-१०९, जिल्हा पोलीस-(००)(०१), जिल्हा पोलीस दल (२०५५०१६८) या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर आदेश हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

(नां. रा. शेरे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस अधीक्षक,
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती.